**सार्वजनिक हिताच्या पायाभूत सुविधा प्रकल्पांच्या अंमलबजावणीमुळे बाधित होणाऱ्या प्रकल्पबाधित व्यक्तींसाठी प्रकल्पबाधित सदनिका निर्माण करुन वितरीत करण्याबाबतचे धोरण .**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग,**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांक याचिका-२०२३ /प्र.क्र.२२०(भाग-१)/झोपनि-२**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- ३० एप्रिल, २०२५.

संदर्भ :-१. गृहनिर्माण विभाग, शासन निर्णय क्रमांक याचिका-२०२३/प्र.क्र.२२० (भाग-१)/ झोपनि-२, दिनांक १९/०८/२०२४.
२. गृहनिर्माण विभाग, शासन पुरकपत्र क्रमांक याचिका-२०२३/प्र.क्र.२२० (भाग-१)/ झोपनि-२, दिनांक ०९/१०/२०२४.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, मुंबई यांचे पत्र क्र.झोपुप्रा/अभि/कार्या/२०२५/५८२२, दि.११.०२.२०२५

**प्रस्तावना:-**

सार्वजनिक हिताच्या पायाभूत सुविधा प्रकल्पांच्या अंमलबजावणीमुळे बाधित होणाऱ्या प्रकल्पबाधित व्यक्तींसाठी प्रकल्पबाधित सदनिका निर्माण करुन वितरीत करण्याबाबतचे धोरण उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील दि.१९.०८.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये निश्चित केलेले आहे. तसेच, संदर्भ क्र.२ येथील दि.०९.१०.२०२४ रोजीच्या शासन पुरकपत्रकान्वये सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्र.१ येथील क्र. x मध्ये सुधारणा करण्यात आलेली आहे.

२. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, मुंबई यांनी संदर्भ क्र.३ येथील दि.११.०२.२०२५ रोजीच्या पत्रान्वये बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रांतर्गत पीएपी सदनिका उपलब्ध होण्यास मदत होण्याकरिता, सदरहू शासन निर्णयातील परिच्छेद क्र.१ येथील क्रमांक x व xi मध्ये सुधारणा करण्याची विनंती शासनास केली आहे. त्यानुषंगाने सदर प्रस्ताव मंत्रिमंडळाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला असून, मंत्रिमंडळाच्या मान्यतेने सदर शासन शुध्दीपत्रक निर्गमित करण्यात येत आहे. सदर शासन शुध्दीपत्रक पुढीलप्रमाणे आहे.

**शासन शुध्दीपत्रक:-**

आता, संदर्भ क्र.१ येथील दि.१९.८.२०२४ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.१ येथील क्रमांक x व xi मध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे:-

(x) सार्वजनिक प्राधिकरण / **शासकीय** मालकीची जमीन (बांधिव/ मोकळ्या/ आरक्षित/ **नामनिर्देशित**) कोणत्याही झोपडपट्टी पुनर्वसन योजनेच्या लगत असल्यास व सार्वजनिक प्राधिकरणाने रितसर ना-हरकत दिल्यास, असा भूखंड शेजारील झोपडपट्टी पुनर्वसन योजनेच्या विकासकाने, त्या सार्वजनिक प्राधिकरणाच्या / **शासकीय जमिनीवरील (बांधिव / मोकळया / आरक्षित / नामनिर्देशित) विनियम ३३ (१०) उपखंड ३.२ आणि ३.८ प्रमाणे** पीएपी/ कोणतीही सार्वजनिक बांधिव सुविधा मोफत प्रस्तावित करून विकसित केल्यास, सदर भूखंड विनिमय ३३ (१०) च्या पोटनियम ७.१ नुसार लगतच्या झोपडपट्टी पुनर्वसन योजनेत समाविष्ट करून, त्या झो.पु. योजनेच्या विकासकास त्याने बांधलेल्या पीएपी / कोणत्याही सार्वजनिक बांधिव सुविधेच्या मोबदल्यात विनियम ३३(१०) च्या उपखंड ३.२ आणि ३.८ प्रमाणे इन-सिटू incentive FSI देण्यात यावा.

(xi) एखादा विकासक खाजगी / सार्वजनिक प्राधिकरणाच्या / **शासकीय** मालकीच्या जागेवर **बृहन्मुंबई विकास नियंत्रण नियमावली-२०३४ मधील विनियम ३३ (१०) च्या उपखंड ३.११ अंतर्गत** योजना राबवित असतांना त्या जमिनीवर झोपड्या **किंवा बांधिव / मोकळया / आरक्षित / नामनिर्देशित** जागा **असतील तर,** सदर झोपड्या **किंवा बांधिव / मोकळ्या / आरक्षित /नामनिर्देशित** जागेवर विकसित करुन विकासक सदर योजनेचे समायोजन (Clubbing/ Amalgamation) **करत असतांना, विकासकास** Incentive (FSI) **विनियम ३३ (१०) च्या उपखंड ३.२ आणि ३.८ प्रमाणे असेल तसेच,** इन-सीटू Incentive (FSI) विक्री बांधीव क्षेत्रफळ हस्तांतरीत करतांना ज्या योजनेबरोबर समायोजन (Clubbing/Amalgamation) करावयाचे आहे तेथील झोपडीधारक यांची अदलाबदल करण्याची आवश्यकता राहणार नाही.

सदर भूखंड विनिमय ३३ (१०) च्या पोटनियम ७.१ नुसार पीएपी योजनेचे Clubbing करतांना ज्या योजनेबरोबर Clubbing करावयाचे आहे, त्या योजनेमध्ये कमीत कमी १८ मी. रुंदीचा रस्ता असणे आवश्यक आहे. तसेच विनियम ३३ (१०) च्या उपखंड ३.११ अंतर्गत योजना राबवित असताना, कमीत कमी ९ मी. रुंदीचा रस्ता असल्यास त्या जागी ६५० घनतेपर्यंत विकासकास पीएपी सदनिका बांधता येतील.

**३.** सदर शासन शुध्दीपत्रकामुळे बृहन्मुंबई विकास प्रोत्साहन नियमावली-२०३४ (DCPR-२०३४) मधील विनियम ३३(१०) मधील उपखंड ३.२ व ३.८ मध्ये बदल/सुधारणा करण्याची आवश्यकता नसल्याने, सदर शुध्दीपत्रकानुसार सदर धोरणाची अंमलबजावणी तात्काळ प्रभावाने करावी.

**४.** सदरहू शासन शुध्दीपत्रक मा.मंत्रिमंडळाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत असून, ते महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आले असून, त्याचा संकेतांक क्रमांक २०२५०४३०१८५६२९०००९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL VITTHAL UKIRADE

Digitally signed by SUNIL VITTHAL UKIRADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT,
2.5.4.20=f1675ab906bc1ceaccfbc91a08ebb1af88bab8226074b0ac8613e6304e94f278, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=902164C64C3FBA37F940B9E5A180D28DD1440382E63E7302A5E29F41123A9B06, cn=SUNIL VITTHAL UKIRADE
Date: 2025.04.30 18:57:30 +05'30'

**(सुनिल उकिरडे)**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा. विरोधी पक्षनेता विधान परिषद/मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. मा. उप सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. सर्व सन्मा. विधानसभा, विधान परिषद सदस्य व संसद सदस्य
८. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
९. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
१०. मा. मंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
११. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१२. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई
१३. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई
१४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र - १, मुंबई.
१५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.

१६. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई

१७. सर्व महानगरपालिका आयुक्त (बृहन्मुंबई महानगरपालिका वगळून)

१८. महानगर आयुक्त, मुंबई महानगर व प्रदेश विकास प्राधिकरण, वांद्रे (पूर्व), मुंबई

१९. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन,वांद्रे (पूर्व), मुंबई-५१

२०. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, मुंबई / पुणे-चिंचवड क्षेत्र / नागपूर/ठाणे.

२१. विशेष कार्य अधिकारी, धारावी पुनर्वकास प्रकल्प, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१

२२. जिल्हाधिकारी, मुंबई शहर / मुंबई उपनगर जिल्हा

२३. अपर जिल्हाधिकारी (अति./निष्का.) मुंबई शहर / पश्चिम उपनगरे / पूर्व उपनगरे

२४. मुख्य अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१

२५. मुख्य अधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१

२६. गृहनिर्माण विभागातील सर्व सहसचिव/उपसचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी

२७. निवड नस्ती (झोपनि-२)